**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितील रस्ते व राष्ट्रीय महामार्ग विहीत मुदतीत खड्डेमुक्त करणेबाबत करावयाच्या कार्यवाहीबाबत मार्गदर्शक सुचना.**

**महाराष्ट्र शासन.**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक-संकिर्ण २०२४/प्र.क्र.७३/रस्ते-१.**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६.०८.२०२४

**प्रस्तावना:-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील रस्ते व पुलांच्या देखभाल व दुरुस्तीकरीता वेळोवेळी शासनाकडून मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात येतात. रस्त्यावरील खड्डे भरणे संदर्भात शासनस्तरावर वेळोवेळी आढावा घेण्यात येतो. पावसाळ्याच्या कालावधीत रस्ते वाहतुकीकरीता सुस्थितीत रहावेत याकरीता क्षेत्रीय अधिका-यांना पावसाळ्यापुर्वी, पावसाळ्याच्या कालावधीत व पावसाळ्यानंतर करावयाच्या कार्यवाहीबाबत वेळोवेळी सुचना देण्यात आलेल्या आहेत.

अतिवृष्टी व पुर परिस्थितीमुळे क्षतिग्रस्त झालेल्या रस्ते व पुलांबाबत करावयाच्या कार्यवाहीबाबत क्षेत्रीय अधिका-यांना सुचित केले आहे. तथापि ,रस्त्यावरील खड्डे भरणे संदर्भात आवश्यक असलेली कार्यवाही करण्यात क्षेत्रीय अधिका-यांकडून अंशत: दिरंगाई होत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. त्यामुळे रस्त्यांवरील खड्डे संदर्भात लोकांमध्ये असंतोष पसरून शासनाची प्रतिमा मलिन होत आहे.

**शासन परिपत्रक :-**

रस्ते खड्डेमुक्त करून वाहतुकीकरीता सुस्थितीत रहावेत याकरिता खालील सुचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**१. रस्ते व त्यावरील कामांचा आढावा घेणे -** सर्व क्षेत्रीय अभियंता यांनी त्यांचे कार्यक्षेत्रातील रस्त्यांची अद्ययावत व आवश्यक माहिती संकलित स्वरुपात उपलब्ध ठेवणे आवश्यक आहे. सर्व मुख्य अभियंता, अधीक्षक अभियंता, कार्यकारी अभियंता यांनी त्यांच्या अखत्यारितील रस्त्यांच्या सद्यस्थितीचा त्वरीत आढावा घ्यावा. अतिवृष्टीमुळे क्षतिग्रस्त झालेल्या रस्त्यांचा व पुलांचा आढावा घ्यावा व खड्डे भरणे व देखभाल दुरुस्तीची कामे त्वरीत हाती घेण्यात यावीत. सा.बां.विभागांतर्गत रस्ते पावसाळ्यादरम्यान वाहतुकीस सुस्थितीत राहतील याकरीता दक्षता घेण्यात यावी.

विविध योजनेंतर्गत प्रगतीत असलेल्या रस्त्यांच्या लांबीत करारनाम्याच्या तरतुदीप्रमाणे रस्त्यावरील दैनंदिन देखभाल दुरुस्ती व संलग्न कामे संबंधित कंत्राटदाराकडून विहीत मुदतीत करून घेणे आवश्यक आहे. वार्षिक देखभाल दुरुस्ती कार्यक्रमातील मंजूर रस्त्याच्या लांबीतील दैनंदिन देखभाल व दुरुस्तीची कामे वेळोवेळी करून घेण्यात यावीत. वार्षिक देखभाल दुरुस्ती कामाच्या ठिकाणी आवश्यक मनुष्यबळ, साहित्य यंत्रे इ. उपलब्ध असल्याबाबत वेळोवेळी आढावा घेण्यात यावा.

**२. कामांची पाहणी करणे व अहवाल सादर करणे -** रस्ते खड्डेमुक्त व वाहतुकीकरीता सुस्थितीत ठेवणेकरीता संबंधित मुख्य अभियंता, अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी त्यांच्या अखत्यारीतील रस्ते व पुल यांची पाहणी खालील नमुद वारंवारीतेनुसार करण्याची दक्षता घ्यावी.

मुख्य अभियंता यांनी प्रत्येक आठवड्यात **दोन** दिवस पाहणी करावी.
अधीक्षक अभियंता यांनी प्रत्येक आठवड्यात **दोन** दिवस पाहणी करावी.
कार्यकारी अभियंता यांनी प्रत्येक आठवड्यात **तीन** दिवस पाहणी करावी.

प्रत्येक दिवशी परीक्षण व पाहणी दौऱ्यादरम्यान संबंधित अभियंता यांनी किमान २०० कि.मी रस्ते पाहणी अनिवार्य राहील. सदर दौऱ्यादरम्यान संबंधितांनी आपल्या अधिनस्त अधिकारी/कर्मचा-यांना तसेच आवश्यकतेनुसार संबंधित कंत्राटदारास सुचना कराव्यात व सदर सुचनांच्या अनुषंगाने करण्यात आलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

सर्व मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता यांनी त्यांच्या अखत्यारित येणा-या रस्त्यांची पाहणी केल्याचा अहवाल रस्त्यांच्या फोटोग्राफ्ससह शासनाने उपलब्ध करून दिलेल्या प्रपत्रात **प्रत्येक सोमवारी** शासनास statusofroads.pwd२०२४@gmail.com वर सादर करावा.

**३. रस्ते खड्डेमुक्त करण्याचे निर्धारित लक्ष्य :-** क्षेत्रीय अधिका-यांनी दि.३१.०८.२०२४ पर्यंत दैनंदिन देखभाल दुरूस्तीची कामे व खड्डे भरणेकरीता सर्व आवश्यक कार्यवाही पूर्ण करून रस्ते खड्डेमुक्त व वाहतुकीरीता सुस्थितीत करून घ्यावेत.

**४. शिस्तभंगविषयक कारवाई :-** सदर कामात हलगर्जी व दिरंगाई करणा-या अधिका-यांवर आवश्यक शिस्तभंगविषयी कारवाई करण्यात येईल याची कृपया नोंद घ्यावी.

५. **मुख्य अभियंता यांची जबाबदारी** :- संबंधित मुख्य अभियंता यांनी खड्डे भरणेविषयक कामाचा वेळोवेळी आढावा घेवून, उद्दिष्टानुसार रस्त्यांची स्वत: पाहणी करून, आवश्यक ती सर्व यंत्रणा कार्यन्वित करून रस्ते खड्डेमुक्त राहतील याची दक्षता घ्यावी. अंतिमत: प्रादेशिक विभागांतर्गत रस्ते खड्डेविरहीत राहतील याची सर्वतोपरी जबाबदारी ही संबंधित मुख्य अभियंता यांची राहील, याची कृपया नोंद घ्यावी.

वरील सुचना सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील रस्ते व राष्ट्रीय महामार्गांना लागू राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०२४०८१६१७३०४८१२१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PADMAKAR PRITHAM LAHANE

Digitally signed by PADMAKAR PRITHAM LAHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=dbcf868246c1233be0da6495734843623d03ac22e47b5e3bfeca26d5118aa90d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=039C83D86A6AEF4AA81A48842237960565694DE4DE4C3B1C8E029C0A3BE9C70A, cn=PADMAKAR PRITHAM LAHANE
Date: 2024.08.16 18:53:58 +05'30'

**( पद्माकर लहाने )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन.**

**प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी-**

१.अपर मुख्य सचिव (सा.बां.) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. सचिव(रस्ते/बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. सर्व उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
४.सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
५. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,
६. सर्व कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,
७. कार्यासन रस्ते-१ (निवड नस्ती).